नवी मुंबई येथील विशेष आर्थिक क्षेत्राच्या सर्वांगिण विकासासाठी व त्याबाबत निर्णय घेण्यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्तीप्रदान समितीची व विशेष आर्थिक क्षेत्र विकासाच्या दैनंदिन कामकाजावर नियंत्रण ठेवण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, सिडको यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ समितीची स्थापना करणेबाबत ........

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.सिआयडी-३३०२/७१५/प्र.क्र.९३/नवि-१०**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक : २४ ऑगस्ट, २००४**

**वाचा : १) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.सिआयडी-३३०२/७१५/ प्र.क्र.९३/ नवि -१०, दि. ११ सप्टेंबर, २००२.**
**२) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.सिआयडी-३३०२ /७१५/ प्र.क्र.९३/ नवि -१०, दि. १९ ऑगस्ट, २००३.**

<u>प्रस्तावना</u> :-

औद्योगिक क्षेत्रातील महाराष्ट्राचे स्थान अग्रेसर ठेवण्याच्या प्रयत्नांचा एक भाग म्हणून शासनाने नवी मुंबई विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करण्यासाठी सिडकोची समन्वय संस्था (Nodal Agency) म्हणून नेमणूक केली आहे. केंद्र शासनाच्या वाणिज्य विभागाने फेब्रुवारी, २००२ मध्ये नवी मुंबई येथे विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्यास मान्यता दिली आहे.

०२. सिडकोमार्फत खाजगी गुंतवणूकीद्वारे नवी मुंबई येथे विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्याच्या प्रस्तावाचा राज्य शासनाने सर्वांगिण विचार करुन पुढील प्रमाणे तीन समित्यांची स्थापना करण्याचा निर्णय घेतला आहे.

....... २

**१) मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदान समिती.**

**२) व्यवस्थापकीय संचालक, सिडको यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ समिती.**

**३) मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समिती.**

०३. शासन निर्णय दिनांक २९.८.२००३ अन्वये मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समितीची स्थापना केली आहे. तर सिडकोने अनौपचारिकरित्या मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदान समितीची व व्यवस्थापकीय संचालक, सिडको यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ समितीची स्थापना केली आहे. सिडकोने अनौपचारिकरित्या स्थापन केलेल्या शक्ती प्रदान समिती व तज्ञ समितीस मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. त्यानुसार पुढीलप्रमाणे शक्ती प्रदान समिती व तज्ञ समितीच्या स्थापनेस मंजूरी देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

विशेष आर्थिक क्षेत्राच्या सर्वांगिण विकासासाठी व त्याबाबत निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदान समितीच्या स्थापनेस शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

**<u>शक्तीप्रदान समिती :</u>**

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २) | प्रधान सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३) | प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग | सदस्य |
| ४) | प्रधान सचिव, (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| ५) | व्यवस्थापकीय संचालक, सिडको | सदस्य सचिव |

ही समिती स्ट्रॅटेजिक गुंतवणूकदाराची नियुक्ती, दस्तऐवज इत्यादींना मान्यता देईल.

....... ३

तसेच नवी मुंबईतील विशेष आर्थिक क्षेत्र विकासाच्या दैनंदिन कामकाजावर नियंत्रण ठेवण्यासाठी खालीलप्रमाणे व्यवस्थापकीय संचालक, सिडको यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ समितीच्या स्थापनेस शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

**तज्ञ समिती :**

| | |
|---|---|
| १) व्यवस्थापकीय संचालक,सिडको | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३) सचिव, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ | सदस्य |
| ४) श्री.पी. कृष्णमूर्ती, उपाध्यक्ष, मॉर्गन स्टेनले | सदस्य |
| ५) श्री.एस. हरिभक्ती, मुख्य कार्यकारी अधिकारी, हरिभक्ती कंपनी | सदस्य |
| ६) श्रीमती झिया मोदी, पार्टनर, सी.झेड.बी. पार्टनर्स | सदस्य |
| ७) श्री.पी. मल्लिक, व्यवस्थापकीय संचालक, वॉर्टसिला डिझेल | सदस्य |
| ८) श्री.अमिताभ कुमार, संचालक, तंत्रशास्त्र- झी टेलिफिल्म | सदस्य |
| ९) महाव्यवस्थापक (विशेष आर्थिक क्षेत्र), सिडको | सदस्य सचिव |

सदर समितीस पूर्ण स्वायत्तता राहील आणि ही समिती विशेष आर्थिक क्षेत्राचे दैनंदिन कामकाज पाहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

२५/४/०५

(आर.आर.जाधव)

उप सचिव

प्रति,

१) **मा. राज्यपालांचे प्रधान सचिव**

२) **मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव**

३) मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे स्वीय सहाय्यक
४) मुख्य सचिव
५) प्रधान सचिव १, नगर विकास विभाग
६) प्रधान सचिव, वित्त विभाग
७) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग
८) व्यवस्थापकीय संचालक, सिडको
९) सचिव, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई
१०) महाव्यवस्थापक (विशेष आर्थिक क्षेत्र), सिडको भवन, सीबीडी-बेलापूर,नवी मुंबई.
११) श्री.पी. कृष्णमूर्ती, उपाध्यक्ष, मॉर्गन स्टेनले (महाव्यवस्थापक(विशेष आर्थिक क्षेत्र), सिडको यांच्या मार्फत)
१२) श्री.एस. हरिभक्ती, मुख्य कार्यकारी अधिकारी, हरिभक्ती कंपनी , (महाव्यवस्थापक(विशेष आर्थिक क्षेत्र), सिडको यांच्या मार्फत)
१३) श्रीमती झिया मोदी, पार्टनर, सी.झेड.बी. पार्टनर्स (महाव्यवस्थापक(विशेष आर्थिक क्षेत्र), सिडको यांच्या मार्फत)
१४) श्री.पी. मल्लिक, व्यवस्थापकीय संचालक, वॉर्टसिला डिझेल, (महाव्यवस्थापक(विशेष आर्थिक क्षेत्र), सिडको यांच्या मार्फत)
१५) श्री.अमिताभ कुमार, संचालक, तंत्रशास्त्र- झी टेलिफिल्म्स (महाव्यवस्थापक(विशेष आर्थिक क्षेत्र), सिडको यांच्या मार्फत)
१६) निवड नस्ती नवि-१०, नगर विकास विभाग.